# तीन छोटे ससे







एके काळी तीन लहान ससे आपल्या आईवडिलां सोबत एका बिळात आरामात राहत होते.

एक दिवस त्यांना त्यांच्या वडिलांनी बोलावले, “आता तुम्ही मोठे झाला आहात तेव्हा घराच्या बाहेर जावून जग बघण्याची वेळ आली आहे.पण सगळ्यात आधी स्वतः साठी सुरक्षित बीळ खोदा आणि जर एखादा कोल्हा आला तर ...”

“आम्ही जमिनीच्या आत बिळात लपून बसायचे,” “तिघांनी एकदम ओरडून सांगितले.





तिन्ही छोट्या सशांनी आईवडिलांचा निरोप घेतला आणि जग बघायला ते उड्या मारत घरातून निघाले.

ते खूप निर्भय आणि उत्साही होते. शेवटी,ते मोठे झाले होते. जसे त्यांना सांगितले जाईल तसेच त्यांनी करण्याची आवश्यकता आता नव्हती. जे त्यांच्या मनात येईल ते करण्यास त्यांना पूर्ण स्वतंत्र्य होते.

पहिल्या सशाला आपल्या घरासाठी सुंदर जागा मिळाली.

"मला ते सगळं करण्याची आवश्यकता नाही, जे मला सांगितलं गेलं आहे. म्हणून मला बीळ खोदण्याची आवश्यकता नाही," तो म्हणाला. "मी माझ्यासाठी फक्त एक मऊ घरटं बनवतो."

त्याने काही फांद्या, वाळलेला घास आणि शेवाळं गोळ्या केलं, लवकरच त्याचे घरटं तयार झालं. त्यामुळे खेळण्यासाठी आणि खाण्यासाठी त्याच्याकडे भरपूर वेळ होता.



ससा उड्या मारत घासासाठी मैदानात आला आणि मऊ-मऊ घास खाऊ लागला. एकदम त्याला कसला तरी वास आला. एक कोल्हा जवळच लक्ष्य ठेवून बसली होती. कोल्हा भुकेला होता आणि छोट्या सशाला पकडू पाहत होती.

जर कोल्हा आसपास आहे तर मला बिळात लपून बसायला पाहिजे. छोट्या सशाने विचार केला.पण त्याच्याजवळ तर फक्त घरटं होतं. घरटं तर पक्ष्यांचं असतं. एक ससा घरट्यात लपू शकत नाही.





“आज फार सुंखद दिवस आहे. घरट्यातून बाहेर ये आणि माझ्याबरोबर खेळ,” धूर्त कोल्हा म्हणाला.

“मला नाही खेळायचे.”

“मग मी तुला पकडेन.”

त्याने एक उडी मारली, तो गुरगुरला. त्याने जागा हुंगली. इकडे तिकडे शोधले.

हद्द झाली, कुठे गेला ससा?





दुसऱ्या सशाला सुद्धा रहायला चांगली जागा मिळाली होती.

“बीळ खोदायला खूप वेळ लागतो. मला वाटते की मी माझ्यासाठी एक झोपडी बांधतो. मग मला जे वाटेल ते मी करू शकेन, ”छोटा ससा म्हणाला.मग त्याने काही फांद्या, शेवाळं, आणि काही पानं गोळा केली. लवकरच त्याचे नवे घर बांधून झाले. आता त्या छोट्या सशाकडे खेळण्यासाठी आणि खाण्यासाठी पुष्कळ वेळ होता.

प्रसन्नतेने तो उड्या मारत घास खाण्यासाठी मैदानावर गेला.



थोड्या वेळाने त्या छोट्या सशाला कोणाचा तरी वास आला.तो एक कोल्हा होता आणि तो जवळच लपून बसला होता. त्याला खूप भूक लागली होती आणि तो छोट्या सशाला पकडू बघत होता.

जर कोल्हा आसपास असेल तर मला जमिनीच्या आत लपायला पाहिजे. छोटा ससा म्हणाला.

पण त्याच्याजवळ तर फक्त त्याची झोपडी होती आणि सशांना लपण्यासाठी लाकडाचे घर उपयोगी नाही.

.

“आज खूप सुखद दिवस आहे. घरातून बाहेर ये आणि माझ्याबरोबर खेळ, चलाख कोल्हा म्हणाला.

“मला नाही खेळायचे.”

“मग मी तुला पकडेल.” कोल्हयाने त्याच्यावर एक उडी मारली. तो गुरकावला. त्याने सगळीकडे हुंगले. सगळीकडे शोधले. त्याने परत गुरकावले, परत सगळीकडे हुंगले आणि शोधले. हद्द झाली, ससा कुठे गेला?



तिसऱ्या सशाला एका क्षणात कळले तो कुठे राहू इच्छितो.

“या जागी मी खोल आणि आरामदायी बीळ बनवतो,” तो म्हणाला.

त्याने सारा दिवस आणि रात्र खोदण्यात घालवली. खेळण्यासाठी आणि खाण्यासाठी त्याच्याकडे वेळच नव्हता. शेवटी त्याने घास, पाने एकत्र करून स्वतःसाठी एक मऊ अंथरूण तयार केले. आता त्याचे घर झाले होते. आपल्या बिळाच्या छोट्या जागेतून तो बाहेर आला आणि गवताच्या कुरणावर गेला. प्रसन्नतेने तो तिथे उड्या मारू लागला. सोनेरी उन्हात खेळला. आणि जे काही रुचकर त्याला मिळाले ते तो खात राहिला.पण तेवढ्यात त्याला कोल्हाचा वास आला, जो शिकारीच्या शोधात होता. आधीच त्याला खूप भूक लागली होती.



जर कोल्हा आसपास आहे तर मला बिळात लपायला पाहिजे. छोट्या सशाने विचार केला आणि लगेच तो बिळात लपला .सशाला लपण्यासाठी बीळ हिच उत्तम जागा होती.

“आज खूप सुखद दिवस आहे. आपल्या बिळातून बाहेर ये आणि,” भूखी लोमड़ी ने गुर्रा कर कहा. माझ्या बरोबर खेळ.”

“जर मला पकडू शकत असेल तर पकड!” छोटा ससा हसत म्हणाला.

कोल्ह्याने एक उडी मारली, तो गुरगुरला आणि त्याने हुंगले, शोधले आणि परत तो गुरकावला, परत हुंगले. पण खूप गुरकावून आणि हुंगुन आणि शोधूनही तो सशापर्यंत पोहचू शकला नाही.



बिळाचे तोंड खूप चिंचोळे होते आणि सशाला पकडण्याच्या प्रयत्नात कोल्ह्याचे तोंड त्यात अडकले. त्याने खूप फिरवले, झटपट केली, पण तो बिळात जावू शकला नाही आणि बाहेरही येवू शकला नाही.

“मला मदत करा, प्लिज!” कोल्हा घाबरला आणि हरला आणि ओरडू लागला.

“बाप रे,” छोटा ससा प्रसन्नतेने म्हणाला. “मी आता मोठा झालो आहे आणि जे काही मला सांगितले जाते ते सगळं करणे मला आवश्यक नाही. जे मला वाटेल ते मी सगळं आता करू शकतो. आणि मला नाही वाटत की, मी तुला मदत करावी. तू तर मला पकडून खाण्याचा प्रयत्न करत होता.

“प्लिज प्लिज,” कोल्हा कळवळ ला. “जे काही तुला पाहिजे ते मी तुला देईन. फक्त मला मदत कर.”

“तर मग वचन दे की तू मला आणि भावांना शांततेने राहू देशील,” ससा म्हणाला.

“हो हो ...मी वचन देतो,”कोल्हा म्हणाला. “मी तसेच करेन. आता मला बाहेर यायला मदत कर.”



सशाने कोल्ह्याच्या नाकावर एवढ्या जोरात धक्का मारला की, तो पलटून बिळाच्या बाहेर पाठीवर पडला.

रिकाम्या पोटी आणि खराब कातडीमुळे लाज वाटून तो पळून गेला.



आधीच्या दोन्ही सशांनी पण झटपट आपल्यासाठी सुरक्षित, आरामदायी बीळ खोदले.

जेव्हा हे काम पूर्ण झाले तेव्हा ते आवडेल ते खायला आणि खेळायला गवताच्या कुरणात आले.

पण कोल्हा शेवटी कोल्हाच. तो त्याने दिलेलं वचन विसरला आणि हुंगत इकडे आला.

तिन्ही छोटे ससे जमिनीच्या आत आपआपल्या बिळात लपून बसले.



**समाप्त**